**कै. महेश संपत गोवर्धने, वरिष्ठ लिपिक, नाशिक यांच्या कायदेशीर वारसास सानुग्रह अनुदान मंजुरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांक- संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०५/१९/प्रशा-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २६ फेब्रुवारी, २०२०.

<u>वाचा -</u>

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९/९/२०१८.
२) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालयाकडून प्राप्त झालेला, दि.३०/११/२०१९ रोजीचा सानुग्रह अनुदान मंजुरीचा प्रस्ताव.
३) कै. महेश संपत गोवर्धने, वरिष्ठ लिपिक, नाशिक यांचे कायदेशीर वारस श्रीमती छाया महेश गोवर्धने यांचा परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत सानुग्रह अनुदान मिळण्याकरीता प्राप्त झालेला दि.०१/१२/२०१८ रोजीचा अर्ज.

**<u>शासन आदेश :-</u>**

उपरोक्त क्रमांक २ अन्वये आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावासोबत श्रीमती छाया महेश गोवर्धने यांच्या क्रमांक ३ येथे नमूद केलेल्या अर्जाच्या अनुषंगाने प्रशासकीय विभाग प्रमुख हे त्यांना संदर्भ क्रमांक १ येथील वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९/९/२०१८ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार कै. महेश संपतराव गोवर्धने यांचे नामनिर्देशनानुसार त्यांच्या पत्नी, श्रीमती छाया महेश गोवर्धने यांना सानुग्रह अनुदान रुपये १०,००,०००/- (रुपये दहा लाख फक्त) इतकी रक्कम सदर शासन निर्णयात नमूद विभागप्रमुख या नात्याने मंजूर करीत आहे.

२. सदर "सानुग्रह अनुदान" शासकीय कर्मचारी सेवेत असताना १० वर्ष शासन सेवा होण्यापूर्वी दि.२१/०९/२०१८ रोजी मृत्यू पावल्यामुळे मंजूर करण्यात येत आहे. सदर आदेश, आदेशाच्या दिनांकापासून १ वर्ष कालावधीसाठी ग्राह्य राहतील.

३. सदरचा खर्च "मागणी क्र.जी-६ २०७१-निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ ०१ नागरी, १०३, अनुकंपा भत्ते, (००)(०६)-परिभाषित अंशदान/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत सानुग्रह अनुदान (२०७१०७२२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

४. हा शासन आदेश, संदर्भ क्र.१ येथे नमूद वित्त विभागाच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ५ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००२२६१२३००६०४२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Basaveshwar Mamadapure

Digitally signed by Santosh Basaveshwar Mamadapure
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3bfe111652996d95372924b1d22cdf88b33dfa2a3de3d8ea011b7d83adc40cb6, serialNumber=557abe7a7194ec5ddc74df537d7d57a9dbda20b1937a2e41983c35f6a38b6ad8, cn=Santosh Basaveshwar Mamadapure
Date: 2020.02.26 16:20:07 +05'30'

**( संतोष ममदापुरे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. विभागीय उप शिक्षण संचालक, नाशिक यांना माहिती तथा उचित कार्यवाहीस्तव,
३. जिल्हा कोषागार कार्यालय, नाशिक यांना माहिती तथा उचित कार्यवाहीस्तव,
४. श्रीमती छाया महेश गोवर्धने, मु.पो. वाडीवऱ्हे, ता. इगतपुरी, जि. नाशिक यांना माहितीस्तव,
५. निवडनस्ती (प्रशा-५).